# आशा भोसले
## यांची भावगीते



क्षीरसागर आणि कं. पुणे-२

# श्रीमती आशा भोसले
## यांनी गायिलेल्या निवडक
# ५० गाण्यांचा संग्रह



- संग्राहक -
कै. दत्तात्रय रा. दिघे
८४९, शुक्रवार पेठ, पुणे २

क्षीरसागर आणि कंपनी, पुणे ४११ ००२.

## १. उठी गोविंदा उठी गोपाळा

उठी गोविंदा, उठी गोपाळा, उषःकाल झाला
हलके हलके उघड राजीवा, नील नेत्र–कमला ॥ ध्रु० ॥

तुझ्यापरी बघ जीवन वारा, मिठी मारतो प्राजक्ताला
धवल केशरी मृदुल सुमांचा, पाऊस अंगणी झिमझिमला
॥ १ ॥

पर्ण पोपटी हिंदोळ्यावर, कंठ फुटतो आनंदाला
तुज भूपाळी आळवित सुंदर, चढली गगनी विहंगमाला
॥ २ ॥

गोठ्यामधले मुके लेकरू, पीत झुरूझुरू कामधेनुला
भरला पान्हा किती आवरू, हासवी अरुणा तव आईला
॥ ३ ॥

## २. मर्म बंधातील ठेव ही

मर्म बंधातील ठेव ही प्रेममय
नेई हरोनी सुखाने दुखाने दुखवी जीव
हृदयांबुजी लीन लोभी अली हा
मकरंद ठेवा लुटण्यासी आला
बांधा जिवाला सुखाशा
मनी घाली मर्म बंधातील ठेव ही

## ३. एका तळ्यात होती बदके पिले सुरेख

एका तळ्यात होती बदके पिले सुरेख
होते कुरूप वेडे पिल्लू तयात एक
कोणी न त्यास घेई खेळावयास संगे
सर्वांहुनी निराळे ते वेगळे तरंगे
दाऊनी बोट त्याला म्हणती हसून लोक
आहे कुरूप वेडे, पिल्लू तयात एक ॥ १ ॥
पिल्लास दुःख भारी, भोळे रडे स्वतःशी
भावंड ना विचारी सांगेल ते कुणाशी
जे ते तयास टोची दावी उगाच धाक
होते कुरूप वेडे पिल्लू तयात एक ॥ २ ॥
एके दिनी परंतु पिल्लास त्या कळाले
भय वेड पार त्याचे वाऱ्यासवे पळाले
पाण्यात पाहताना चोरूनिया क्षणैक
त्याचे त्याच कळाले तो राजहंस एक

## ४. दळिता कांडिता

दळिता कांडिता । तुज गाईन अनंता ॥ १ ॥
न विसंबे क्षणभरी । तुझे नाम गा मुरारी ॥ २ ॥
नित्य हाचि कारभार । मुखी हरि निरंतर ॥ ३ ॥
मायबाप बंधुबहिणी । तू बा सखा चक्रपाणी ॥४॥
लक्ष लागले चरणासी । म्हणे नामयाची दासी ॥५॥

## ५. अमृताहुनी गोड नाम तुझे देवा

अमृताहुनी गोड नाम तुझे देवा ।
मन माझे केशवा का बा न घे
सांग पंढरीराया काय करू यासी ।
का रूप ध्यानासी न ये तुझे ?
कीर्तनी बैसता निद्रे नागविले ।
मन माझे गुंतले विषयसुखा ।
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति ।
नये माझ्या चित्ती नामा म्हणे ।। १ ।।

## ६. वेड्या बहिणीची वेडी रे माया

सोनियाच्या ताटी, उजळल्या ज्योती
ओवाळीते भाऊराया रे !
वेड्या बहिणीची रे वेडी माया ।
माया माहेरची पृथ्वी मोलाची
साक्ष याला बाई, चंद्रसूर्याची
कृष्ण द्रौपदीला, सखा रे भेटला
पाठीशी राहू दे छाया रे !
वेड्या बहिणीची रे वेडी माया ।
चांदीचे ताट, चंदनाचा पाट
सुगंध गंध दरवळे, रांगोळीचा थाट
भात केशराचा, घास अमृताचा

जेऊ घालीते भाऊ राया रे !
वेड्या बहिणीची रे वेडी माया !
नवलाख दिवे हे निळ्या आभाळी
वसुंधरा अशी चंद्रा ओवाळी
नक्षत्रांची सर येई भूमीवर
पसरी पदर भेट घ्याया
चंद्र वसुधेला सखा रे भेटला
पाठीशी राहू दे छाया रे
वेड्या बहिणीची रे वेडी माया !
पंचप्राणाच्या वाती, उजळल्या ज्योती
वेड्या मायेची घेऊनी आरती
ओवाळीते माझी काया, भाऊराया !
वेड्या बहिणीची रे वेडी माया !

## ७. तुझ्या गळा माझ्या गळा

तुझ्या गळा माझ्या गळा, गुंफू मोत्यांच्या माळा
ताई आणखी कोणाला ? चल रे दादा चहाटळा ॥ १ ॥
तुज कंठी, मज अंगठी, आणखी गोफ कोणाला ?
वेड लागले दादाला, मला कुणाचे ? ताईला ॥ २ ॥
तुज पगडी मज चिरडी, आणखी शेला कोणाला ?
दादा, सांगू बाबाला ? सांग तिकडच्या स्वारीला ॥ ३ ॥
खुसू खुसू गाली हसू, वर वर आपुले रूसू रूसू
चल निघ येथे नको बसू, घर तर माझे तसू तसू ॥ ४ ॥

कशी कशी आज अशी, गम्मत ताईची खाशी ?
आता गट्टी फू दादाशी, तर मग गट्टी कोणाशी ॥ ५ ॥

## ८. दैव जाणिले कुणी

दैव जाणिले कुणी हो ऽ दैव जाणिले कुणी !
लवांकुशाचा हलवी पाळणा
वनी वाल्मिकी मुनी हो ऽ दैव जाणिले कुणी !
मृग सोन्याचा जगी असंभव
तरीही तयाला भुलले राघव
श्रीरामाला सतवून गेल्या
शक्ति मायाविनी
दैव जाणिले कुणी हो ऽ दैव जाणिले कुणी !
आपाद मस्तक विशुद्ध सीता
पतिव्रता ती मूर्त देवता
पतितपावने तिला त्यागिली
तशात ती गर्भिणी हो
दैव जाणिले कुणी हो ऽ दैव जाणिले कुणी !
राजपुत्र जे नृपती उद्याचे
शिशुपण त्यांचे दीनपणाचे
रत्न कुंदुका जागी हाती
मातीची खेळणी हो, दैव जाणिले कुणी !

## ९. देव जरी मज कधी भेटला

देव जरी मज कधी भेटला
काय हवे ते माग म्हणाला
म्हणेन प्रभु रे माझे सारे जीवन देई मम बाळाला !
कृष्णा गोदा स्नान घालू दे
रखुमाई तीट लावू दे
ज्ञानेशाची गाऊनी ओवी
तुकाई निजवू दे तुजला !
शिवरायाच्या मागिन शौर्या
कर्णाच्या घेईन औदार्या
ध्रुव चिलयाच्या अभंग प्रेमा
लाभू दे चिमण्या राजाला !

## १०. जगी हा खास वेड्यांचा

जगी हा खास वेड्यांचा पसारा माजला सारा
गमे या भ्रांत संसारी ध्रुवाचा वेडा हा तारा
कुणाला वेड कनकाचे कुणाला कामिनी जाचे
भ्रमाने राजसत्तेच्या कुणाचे चित्त ते नाचे
कुणाला देव बहकवी कुणाला देश चळ लावी
कुणाची नजर धर्माच्या नशेने धुंदली भारी
अशा या विविध रंगांच्या पिशाच्या लहर बहरोनी
दुरंगी दीन दुनियेची जवानी रंगली सारी

## ११. अपुरे माझे स्वप्न राहिले

अपुरे माझे स्वप्न राहिले
का नयनांनो जागे केले ? ॥ ध्रु० ॥
तुमची ओळख सांगून स्वारी
आली होती माझ्या दारी
कोण हवे हो म्हणता त्यांना
दटावुनी मज घरात नेले ॥ १ ॥
बोलत बसता बघून मजला
गुपित चोरटे ऐकू कशाला
जाण्याचा ते करूनी बहाणा
गुपचूप माझ्या मनात लपले ॥ २ ॥
नीज सुखाची तुम्हा लागली
मंद पावली स्वारी आली
गोड खेळीने चहाडी केली
अधराशी नच बोलू दिले ॥ ३ ॥

## १२ विठु माझा लेकुरवाळा

विठु माझा लेकुरवाळा, संगे गोपाळांचा मेळा ॥ १ ॥
निवृत्ती हा खांद्यावरी, सोपानाचा हात धरी ॥ २ ॥
पुढे चाले ज्ञानेश्वर, मागे मुक्ताबाई सुंदर ॥ ३ ॥
गोराकुंभार मांडीवरी, चोखा जीवा बरोबरी ॥ ४ ॥
बंका कडियेवरी, नामा करंगुळी धरी ॥ ५ ॥
जनी म्हणे गोपाळा, करी भक्तांचा सोहळा ॥ ६ ॥

## १३. श्रीरामाच्या पूजेसाठी

फुले प्रीतीची आनंदाच्या अश्रूने भिजली
श्रीरामाच्या पूजेसाठी आज अयोध्या सगळी सजली
गुढ्या पताका तोरण साजरे
रूपे घेती अवयव माझे
अभंग नौबत कंठामधुनी दाही दिशा जागली
हृदय म्हणू की हे सिंहासन
बसा रघुवरा घेते दर्शन
स्पर्श सुखाने अवघी काया थरथरली ऽ ऽ लाजली

## १४. वाजवी मुरली शामसुंदरा

वाजवी मुरली शामसुंदरा, तुझ्या मंदिरी नाचे मीरा
करी करताळा पायी घुंगरु
जन्म तुडविते हा क्षणभंगुर । देह नव्हे हा मोरपिसारा ।।१।।
कसले कलियुग मी द्वापारी
गोपवधू मी तू कंसारी । कालिंदीचा रम्य किनारा ।।२।।
गोपीनाथ तू, मी तर गोपी
पुण्यशील तुज जगास पापी । आले आले मी अभिसारा ।।३।।
मिठीत मिटले विश्व मुकुंदा
मी आणविली ब्रह्मनंदा । तू मी दोघे अमृतधारा ।। ४ ।।

## १५. गेला मोहन कुणीकडे

रिमझिम पाऊस पडे सारखा यमुनेलाही पूर चढे
पाणीच पाणी चहुंकडे ग बाई गेला मोहन कुणीकडे ?

तरुवर भिजले भिजल्या वेली
ओली चिंब राधा झाली
चमकून लवता वरती बिजली
दचकून माझा ऊर उडे । गेला मोहन कुणीकडे ?

हाक धावली कृष्णा म्हणूनी !
रोखूनी धरली दाही दिशानी
खुणवितो तुज कर उंचावुनी
गुंजत मंजुळ मुग्ध चुडे । गेला मोहन कुणीकडे ?

जलाशयाच्या लक्ष दर्पणी
तुझेच हसरे बिंब बघुनी
हंसता राधा हिरव्या रानी
पावसातही ऊन पडे । गेला मोहन कुणीकडे ?

## १६. ये रे घना

येरे घना, येरे घना, न्हाऊ घाल माझ्या मना ॥ धृ० ॥

फुले माझी अळुमाळु, वारे बघे चुरगळू
नको नको म्हणताना, गंध गेला रानावना ॥ १ ॥

टाकुनिया घरदार, नाचणार नाचणार
नको नको म्हणतांना, मनमोर भरारेना ॥ २ ॥

नको नको किती म्हणू, वाजणार दूर वेणू
बोलावतो सोसाट्याचा, वारा मला रसपाना ॥ ३ ॥

## १७. स्वप्नातल्या कळ्यांनो

स्वप्नांतल्या कळ्यांनो, उमलू नकाच केव्हा
गोडी अपूर्णंची, लावील जीव वेडा
रेखीकृती सुखाच्या, चित्ती चितारलेल्या
साशंक कल्पनांनी, सहजी विरूनी गेल्या
कधी सोशिला उन्हाळा, कधी लाभला विसावा
नैराश्यकृष्णमेघी आशा कधी बुडावी
विरहात चिंब भिजुनी, प्रीती फुलोनी यावी
काट्या विना न हाती, केव्हा गुलाब यावा

## १८. कंठातच रुतल्या ताना

कंठातच रुतल्या ताना
कुठे ग बाई गेला कान्हा
कुणीतरी जा, जा, जा, घेऊनी या मोहना ॥ धृ० ॥

कदंब फांद्यावरी बांधिला
पुष्पपल्लव गंधित झाला
कसा झुलावा परि हा निश्चल, कुंजविहारीविना ॥ १ ॥

थांबे सळसळ जशी वृक्षांची
कुजबूज सरली क्षणी पक्षांची
ओळखीचे स्वर कानी न येता, थबके ही यमुना ॥ २ ॥

मुरलीधर तो नसता जवळी
सप्तस्वरांची मैफल कुठली ?
रासक्रिडेची स्वप्ने सरली, एका कृष्णाविना ॥ ३ ॥

## १९. सहज सख्या

सहज सख्या एकटाच येई सांजवेळी
वाट तुझी पाहीन त्या आम्रतरुखाली ॥ धृ० ॥

हिरवळीत गीत गात
सांजरंगी न्हात न्हात
स्वप्नांना रंगवुया, लेवुनिया लाली ॥ १ ॥

अधरी जे अडत असे
सांगीन तुज गुज असे
प्रीती ही प्रीतीवीण अजुनही अबोली ॥ २ ॥

तृणपुष्पे मोहक ती
उमलतील एकांती
चांदण्यात उमलवुया, प्रीत भावभोळी ॥ ३ ॥

## २०. जादुगारा

जादुगारा, तुला मी सांग कशी भाळले ? भाळले ॥धृ०॥
ओळख अपुली झाली अवचित
ओढ लागली मजला नकळत
गोड गुलाबी मोहक जाळे, भवती का फेकिले ॥ १ ॥

साधी भोळी मी तर बाई, गंध प्रीतीचा मजला नाही
धुंद जाहले, ध्यानी रंगले, नादी का लाविले ॥ २ ॥

काय करावे काही सुचेना, तुजविण मजला चैन पडेना
बघता बघता तुझ्या बंधनी, मजसी का वेढीले ॥ ३ ॥

## २१. म्हाएरी करमत नाही

कसं कुणाला सांगू ग बाई, मला म्हाएरी करमत न्हाई ॥धृ.॥

माझं माहेर गोजिरवाणं, ततं मायेचं पिकतंय सोनं
हळी देल्यात ढवळ्या गाई, तरी म्हाएरी करमत नाही॥१॥

मी करते येणी फणी, ततं नसल उटलं कुणी
चैन जिवाला माझ्या नाही, म्हाएरी करमत न्हाई ॥ २ ॥

मी भाकर करते जेव्हा, लई आठव येतो तवा
चुलीपाशी बी चावट घाई, मला म्हाएरी करमत नाही ॥३॥

## २२. अवती भवती डोंगर झाडी

अवती भवती डोंगर झाडी, मधी माझी ग सासुरवाडी
दोन मजली रंगीत माडी, दारी बांधली बैलांची जोडी।।धृ०।।

हिचा भरतार तालेवार, तालुक्याचा सावकार
गोड बोल्या गंगाराम, गडी गावात रुबाबदार
दोन डोंगरामधली वाट, वर चढाया अवघड घाट
घोडं घेऊन मुराळी आला, मी निघाले नांदायाला
नवी कोरी नेसुनी साडी ।। १ ।।

घोडं चालतंय दिडकी चाल, झोकं घेतंय कानात डूल
माझ्या गळ्यात वजरटिका, ग नाकी नथीनं धरला ठेका
घातली हौसेन सोन्याची बुगडी ।। २ ।।

सख्या संगती एकांतात, प्रीत फुलली अंधारात
हुईल काळजात गोड गुदगुली, लाल होतील गाल मखमली
मिळल मिठीत मधाची गोडी ।। ३ ।।

## २३. गाडीवान दादा

बैल तुझे हरणावाणी गाडीवान दादा
तरुण माणसाच्या मनीचा जाण तू इरादा ।। धृ० ।।

वाट नागमोडी वेडी तुझी फुलोऱ्याची जोडी
ऊन सावल्याचा झाला आगळा काशिदा ।। १ ।।

समोरून येतो वारा, शिनभाग जातो सारा
दिठीपुढे येतो जातो गाव तो दहादा ॥ २ ॥

गाव साजनीचा दूर, शहारून येता कर
सूर तिच्या लावण्याचे घालतात साद ॥ ३ ॥

परत साद देण्यासाठी, शीळ येऊ पाहे ओठी
पलीकडे खेड्यामाजी, वसे एक राजा ॥ ४ ॥

स्वप्न भारल्या एकांति, तिचा हात यावा हाती
क्षणी भेटवी रे मित्रा, राधिका मुकुंदा ॥ ५ ॥

## २४. उघडी नयन शंकरा

उघडी नयन शंकरा वसंत ये वनांतरी
दऱ्या दऱ्यात नाचती गात यक्षकिन्नरी
उघडी नयन शंकरा

अचल ध्यान हे तुमचे, मला न आज पाहवे
जिवा शिवांत दूरता, मला न आज साहवे
ऊठ चंद्रशेखरा, करास या धरी करी
उघडी नयन शंकरा

पहा प्रसन्न पद्मिनी जलाशयात डुंबिती
नील कमलिनीस त्या राजहंस चुंबिती
अधीर आस माझिया, थरथरे मनी उरी
उघडी नयन शंकरा

## २५. घराकडं जाऊ द्या

असेल काटे तरी काटा माझ्या तळपायांत
लाडी गोडीत तुम्ही फिरविता हात
याचा बोभाटा होईल उद्या
मला लौकर घराकडे जाऊ द्या
अहो हो साजना दूर व्हा, दूर व्हा
जाऊ द्या सोडा जाऊ द्या ॥ धृ० ॥

अर्ध्या वाटेत काय मला लागलं
कसे कोठून तुम्ही इथं धावला
आहे तिथंच काटा तिथं राहू द्या
मला लंगडत घराकडं जाऊ द्या
अहो हो सजना दूर व्हा, दूर व्हा, जाऊ द्या ॥१॥

तिन्ही सांजची वेळ अशी वाकडी
इथं शेजारी नणंदेची झोपडी
आहे तस्सच येणं जाणं राहू द्या
आता अब्रूनं घराकडं जाऊ द्या
अहो हो सजना दूर व्हा, दूर व्हा, जाऊ द्या ॥२॥

## २६. गेले द्यायचे राहून

गेले द्यायचे राहून तुझे नक्षत्राचे देणे
माझ्यापास आता कळ्या आणि थोडी ओली पाने
आलो होतो हासत मी काही श्वासासाठी फक्त
दिवसाचे आता ओझे रात्र रात्र सोडी रक्त
आता मनाचा दगड घेतो कण्हत उशाला
होते कळ्यांचे निर्माल्य आणि पानांचा पाचोळा

## २७. ज्ञानदेव बाळ माझा

ज्ञानदेव बाळ माझा, गीता सांगे भगवंता।
लक्ष द्या हो विनविते, मराठी मी त्याची माता ॥ धृ० ॥
गोड माझ्या सोनुल्याचा, लळा लागे बाळपणा।
बांधुनिया घुंगरवाळे, अंगी नाचे थोरपणा।
निरूपण सांगायला, तुम्ही द्या हो शहाणपणा।
बाळमुखी मोठा घास, भरवा हो, जगन्नाथा ॥ १ ॥
निरक्षर लोकांसाठी, प्राणाचेनी देऊन मोल।
अमृताते जिंकीत पैजा, धावे मराठीचा बोल।
ज्ञानदीप डोळीयांचे, तेजाळती तेजोगोल।
देवगुरु खाली आले, जोडूनिया दोन्ही हात ॥ २ ॥

## २८. रुपेरी वाळूत माडांच्या बनांत

रुपेरी वाळूत माडांच्या बनात ये ना
बनांत ये ना जवळ घे ना
चंदेरी चाहूल लावीत प्रीतीत ये ना
प्रीतीत ये ना जवळ घे ना
बेधुंद आज आसमंत सारा
कुंजात गात मंद धुंद वारा
दाटे उरी प्रिया तुझा इशारा
देहावरी फुले असा शहारा
तुझा इशारा. . .असा शहारा
लाजेत आज ही फुले नहाती
गाली अनार प्रीत. . .गीत गाती ! !
तू ये निशा अशी करी पुकारा
दे ये प्रिया मला तुझा निवारा
तुझा निवारा. . .तुझा निवारा. . .

## २९. पण वरमाला पडणार कधी !

तू नजरेने 'हो' म्हटले मग वाचेने वदणार कधी ?
कर पडलेत गळ्यांत तुझे पण, वरमाला पडणार कधी ?
तुझे हासरे हृदय आठवित दुःखाची विसरते घडी
या हृदयाचा त्या हृदयाशी, संगम रे होणार कधी ?
नसताना तुझी आठवण मना जाळिते पदोपदी
एक विचारू तुला काय होणार कधी ग सप्तपदी ?

## ३०. मूर्त रूप जेथे ध्यान श्रीपतीचे

मूर्त रूप जेथे ध्यान श्रीपतीचे
पंढरीला लाभे भाग्य वैकुंठीचे ॥ धृ० ॥
धुंडित शोधित सख्या पांडुरंगा
भक्ती होऊनिया आली चंद्रभागा
तीर्थ रोज घेता देव चरणांचे
उजळे पावित्र्य जिच्या जीवनाचे ॥ १ ॥
मातापित्याच्या प्रेमाचा पाईक
पंढरीला येता पुत्र पुंडलिक
वेड लागोनी त्या भक्त दर्शनाचे
विटेवरी उभे द्वैत विठ्ठलाचे ॥ २ ॥
आषाढीला होता वैष्णवांची दाटी
नाद प्रलयांत बुडे सर्व सृष्टी
युगे अठ्ठावीस बाळ देवकीचे
जोजवीत जेथे पान पिंपळाचे ॥ ३ ॥

## ३१. करिते जीवनाची भैरवी

सीमा झाली सोसण्याची, परी दुःख संपले नाही
करिते जीवनाची भैरवी ।
हे काय जिणे नित दुःख पिणे रडता रडता सुख भासविणे
नाती फिरली, प्रीती फिरली माझे कुणी उरले नाही ।
मज तार अता बा मार अता मन वावरले तनु सावरता
ही काय दशा हे परमेशा ये धावुनिया लवलाही ।

## ३२. जिवलगा राहिले रे दूर घर माझे

जिवलगा ! राहिले रे दूर घर माझे
पाऊल थकले, माथ्यावरचे जड झाले ओझे

राहिले रे दूर घर माझे
किर्र बोलते घनवनराई
सांज सभोती दाटुनी येई
सुखसुमनांची सरली माया, पाचोळा वाजे
राहिले रे दूर घर माझे

गाव मागचा मागे पडला
पायदळी पथ तिमिरी बुडला
ही घटकेची सुटे सराई मिटले दरवाजे
राहिले रे दूर घर माझे

निराधार मी, मी वनवासी
घेशील केव्हा मज हृदयाशी
तूच एकला नाथ अनाथा महिमा तव गाजे
राहिले रे दूर घर माझे

## ३३. विसरशील खास मला

विसरशील खास मला दृष्टीआड होता
वचनेही गोड गोड देशी जरी आता

दृष्टिआड झाल्यावर सृष्टीही निराळी
व्यवसायही विविध विविध विषय भोवताली
गुंतती तयांत कुठे वचन आठविता ॥ १ ॥
स्वैर तू विहंग अंबरात विहरणारा
वशही वशीकरण तुला सहज जादुगारा
लाभ माझा मज केवि जसा होता ॥ २ ॥
अंतरिची आग तुला जाणवू कशाने
बोलवे न वेदनास वदन दुःख नेणे
या परता दृष्टिआड होऊ नका नाथा ॥ ३ ॥

## ३४. तू दूर दूर तेथे

तू दूर दूर तेथे हुरहूर मात्र येथे
विरहांत रात्र मोठी प्रेमीजनास वाटे ॥ धृ० ॥
शब्दात सांगू कैसे ते दुःख अंतरीचे
ओलावले दवांत हे काठ पापण्यांचे !
भरला स्वरांत कंप, कंपात भान दाटे ॥ १ ॥
मी भाबडी मनाची आहेच स्वप्नवेडी
विरूनी तुझ्यांत जावे ही एक आस वेडी !
राहो अभंग प्रीती राहो अभंग नाते ॥ २ ॥
भालावरी असे हे सौभाग्य लाल कुंकू
विक्राळ काळ येता दोघे तयास जिंकू
स्फुरता मनांत आशा ओठांत गीत येते ॥ ३ ॥

## ३५. ही वाट दूर जाते

ही वाट दूर जाते स्वप्नामधील गावा
माझ्या मनातला का तेथे असेल रावा ?

जेथे मिळे धरेला आभाळ वाकलेले
अस्ताचलास जेथे रविबिंब टेकलेले
जेथे खुळ्या ढगांनी रंगीन साज घ्यावा
माझ्या मनातला का तेथे असेल रावा ?

स्वप्नामधील गावा स्वप्नामधून जावे
स्वप्नातल्या प्रियाला मनमुक्त गीत गावे
स्वप्नातल्या सुखाचा स्वप्नीच वेध घ्यावा
माझ्या मनातला का तेथे असेल रावा ?

## ३६. मी मनात हसता

मी मनांत हसता प्रीत हसे, हे गुपित कुणाला सांगू कसे ?
चाहुल येता ओळखिची ती, बावरल्यापरी मी एकांती
धुंद जिवाला डोळ्यापुढती, नव्या नवतीचे स्वप्न दिसे.
किंचित ढळता पदर सावरी, येता जाता माझी मला मी
एकसारखी पाहे दर्पणी, हे वेड म्हणू तर वेड नसे
काही सुचेना काय लिहावे, पत्र लिहू तर शब्द न ठावे
नाव काढीता रूप आठवे, हा उगा मनाला भास असे.

## ३७. ओळख पहिली गाली हसते

ओळख पहिली गाली हसते,
सांग दर्पणा कशी मी दिसते ॥ धृ० ॥

आषाढीच्या तिन्ही सांजेला,
पैलतीरी त्या पाणवठ्याला
बघुनि ज्याला जीव लागला
आठवण त्याची हृदयी ठसते ॥ १ ॥

नाव जयाचे घुमता कानी,
चित्र रंगले मिटले नयनी
बाहुपाशी जाता विरूनी,
माझ्यावर मी जेव्हा रुसते ॥ २ ॥

करी बांगडी राजवाखी,
नथणी बुगडी तुझ्यासारखी
तुझ्यावरी तो रत्नपारखी
म्हणुनि तुजला घडी घडी पुसते ॥ ३ ॥

## ३८. ज्योत दिव्याची मंद तेवते

ज्योत दिव्याची मंद तेवते देवघरातील देवापाशी
मीरा नाचे कृष्णासाठी, चित्त रंगले कृष्णापाशी ॥ धृ० ॥

स्वप्नी ऐकते मधुर बासरी, मीरा होते क्षणीं बावरी
आणि मनाने धावत जाते, हितगुज करते श्रीरंगासी ॥ १॥

पाषाणातही देव पाहिले, भजनी गायनी हरपले
उपहासाने जग तिज हसले, मीरा बोले ती अविनाशी ।।२।।

नयनी लपले रूप सावळे, अधरी टेकले शब्द कोवळे
त्या शब्दातून दर्शन घडले, मिठी मारली चरणापाशी ।।३।।

## २९. कोण येणार ग पाहुणे

कोण येणार ग पाहुणे ?
ताई मला सांग, मला सांग, कोण येणार ग पाहुणे ?

आज सकाळपासून ग
गेली ताईची घाई उडून
आरशासमोर बसून आहे बुवा ऐट
घाल बाई नवे दागिने ।। १ ।।

झाली झोकांत वेणी फणी,
नवीन कोरी साडी नेसूनी
ताई माझी जरी दिसे देखणी
गोरे गोरेपान तेही आहेत सुंदर म्हणे

नको सांगून जा ग मला
मीच मजा सांगते तुला
गोड गोड खाऊ मला देतील नवे मेहुणे ।

## ४०. नको ताई रुसू कोपऱ्यात बसू

नको ताई रुसू कोपऱ्यात बसू
येऊ दे गालात खुदकन हसू ॥ धृ० ॥
इवल्याशा नाकावर मोठा मोठा राग
देऊ काय तुला हवे ते माग
नवरा हवा का लठ्ठ हवी सासू ॥ १ ॥
बाहुलीच्या लग्नाचा खेळ गडे खेळू
लग्नात बुंदीचे लाडू आता वळू
नवीन कपड्यात छान छान दिसू ॥ २ ॥
चांदीचे ताट तुला चंदनाचा पाट
केशरी भात केला आहे मोठा थाट
ओठाने आले बाई लडिवाळ हसू ॥ ३ ॥

## ४१. तुला पाहते रे तुला पाहते

तुला पाहते रे तुला पाहते
तुझी मूर्त माझ्या उरी राहते
जरी आंधळी मी तुला पाहते
तुझ्या संगतीचा जिवा ध्यास लागे
तुझ्या हासण्याने मनी प्रीत जागे
तुझ्या गायनाने मी सुखी होतसे रे
किती भाग्य या घोर अंधेपणी ही

दिसे स्वप्न झोपेत जागेपणी ही
उणे लोचनांचे सुखी साहते रे
कधी भक्त का पाहतो ईश्वराला
नदी न्याहळी का कधी सागराला
तिच्या सारखी मी सदा नाहते

## ४२. धक्का लागला ग मघाशी कुणाचा

धक्का लागला ग मघाशी कुणाचा
तोल सावरेना बाई अजुनी मनाचा
उगा हासला तो उगा लाजले मी
करी वीज त्याच्या उरी भाजले मी
ठसा राहील ग मुक्या भाषणांचा
पुढे चालते मी फिरे पाय मागे
कशाची कळेना अशी ओढ लागे
सुटे त्यात वारा खुल्या श्रावणाचा
झरू लागल्या ग ढगांतून धारा
मनीच्या विजेचा मनी कोंडमारा
ठिकाणा तरी ग कुठे साजणाचा
भिजे पावसाने जरी अंग सारे
उफाळून येती उरीचे निखारे
शिरे नाद अंगी पैंजणाचा

## ४३. नाही खर्चिली कवडी दमडी

नाही खर्चिली कवडी दमडी, नाही वेचिला दाम
बाई मी विकत घेतला शाम

कुणी म्हणे ही असेल चोरी, कुणा वाटते असे उधारी
जन्मभरीच्या श्वासाइतुके मोजियले हरिनाम
बाळ गुराखी यमुनेवरचा, गुलाम काळा संता घरचा
हाच तुक्याचा विठ्ठल आणि दासाचा श्रीराम
जितके मालक तितकी नावे, हृदयी तितुकी यांची गावे
कुणा न ओळखी तरी याला दीन अनाथ अनाथ

## ४४. नाच नाचुनी अति मी दमले

नाच नाचुनी अति मी दमले थकले रे नंदलाला
निलाजरेपण कटिस नेसले निसुगपणाचा शेला
आत्मस्तुतीचे कुंडल कानी गंध चढविला भाळा
उपभोगांच्या शतकमळांची कंठी घातली माला, थकले रे
विषय वासना वाजे वीणा अतृप्ती ताला
अनव अनिती नुपूर पायी कुसंगती कर ताला
लोभ प्रलोभन नाणी फेकी मजवरी आला, थकले रे
स्वतःभोवती घेता गिरक्या अंधपणा की आला
तालाचा मज तोल कळेना, सादही गोठून गेला
अंधारी मी उभी आंधळी, जीव जीवना भ्याला, थकले रे

## ४५. का हो धरिला मजवरी राग

का हो धरीला मजवरी राग
शेजारच्या घरी येता वरचेवरी
तुमचे लाडिक बोल येती कानावरी
आणि जागेपणी येती स्वप्नाला जाग
वळती तुमचे डोळे माझ्या खिडकीकडे
भारी हट्टी स्वभाव तुम्ही जाता पुढे
जाता येता परी माझी फुलवून बाग
जाणे येणे होते तुमचे माझ्या घरी
तुमच्या पावलांनी वाट पडली परसदारी
वाटतं फिरून याल अवचित केव्हा तरी
वाटतं न्याहाळती खुळ्या प्रितीचा भाग

## ४६. विठ्ठल रखुमाई

विठ्ठल रखुमाई परी, आईबाप हे दैवत माझे
असता माझ्या घरी, कशाला जाऊ मी पंढरपुरी ॥ धृ० ॥
कैलासाहुनी थोर मन हे माझ्या बाबांचे
शंकराला विष न पचले प्रपंच दुःखाचे
पचवुनी देती अमृत मजला संत वचनांचे
पुंडलिकापरी हात जोडुनी सदैव सामोरी ॥ १ ॥
सात समिंदर भरूनी उरली माया आईची
प्रेमळतेला उपमा नाही वाणी ज्ञानेशाची

मंगल शोभा तिच्या ललाटी कोटी चंद्राची
वत्सलमूर्ती माय माऊली मानस देव्हारी ॥ २ ॥
विटेवरचे जगजेठी हे आले माझ्यासाठी
संसाराचा थाट मांडूनी केली मजला मोठी
करपुष्पांची घालुनि माला तुमच्या मी कंठी
चरणांचे हे तीर्थ घेते चंद्रभागेपरी ॥ ३ ॥

## ४७. गळ्यात माझ्या तूच जिवलगा

गळ्यात माझ्या तुच जिवलगा, मंगल मणी बांधिले
जन्मोजन्मीची सुवासिन मी तुझ्यामुळे जाहले ।
दिसायला मी काळी सावळी, मुलुखाची लाजरी
नटणं सजणं या भोळीला ठाऊक असता परी ।
तव नयनांचा पाऊस अवचित पडला अंगावरी
वठल्या देही चैत्र पालवी कणकण मोहरले ।
प्रितीची तव खातर होऊन तुझ्याकडे धावले
जनरूढीच्या लोहश्रृंखला झाली जड पाऊले ।
कुचाळकीची आग पसरूनी, उठता ही वादळे
हात देऊनी तूच राजसा फुलापरी झेलले ।
पाचूचा हा चुडा भरूनिया तुजभवती नाचले
आनंदाचे अश्रु उधळीत सप्तपदी चालले ।
तूच दयाळा सौभाग्याचे, लेणे मज अर्पिले
अभागिनीच्या कुंकू कपाळी, सख्या तूच लाविले ।

## ४८. नाव कशाला घेऊ मी मी ते

नाव कशाला घेऊ मी ते
ध्यानी मनी वा रे गुणगुणते ॥ ध्रु० ॥

नयनी हसते नाव तयांचे
गाली रंगते गूज मनीचे
कलिका ही तर फूल उद्यांचे
इथेच फुलते इथे बहरते
नाव कशाला घेऊ मी ते ॥ १ ॥

सात पाऊले येता चालून
स्वप्न युगांचे ये साकारून
मिटल्या नयनी घेते पाहून
मलाच त्याची चाहूल कळते
नाव कशाला घेऊ मी ते ॥ २ ॥

इथे लाभली आई मजला
बहीण प्रेमळ शामला
उंबरठ्यावर स्वर्ग लाभला
कुणा असे हे भाग्य न मिळते
नाव कशाला घेऊ मी ते ॥ ३ ॥

## ४९. रहाट फिरतो रहाट ग

रहाट फिरतो रहाट ग
दिवस संपतो पडते झांजड पुन्हा उगवते पहाट

दिसे पोहरा जाता येता
खाली भरतो वरी पालथा
कोण चालवी रहाट असला, कसले त्याला चऱ्हाट ग

सूर्य समुद्री असाच बुडतो
उजेड सांडित वरती चढतो
पिढ्या संपल्या तरी फिरतसे, रहाट ऐसा जुनाट ग

फुलवंतीचे जिणे देखणे
सहज उचलणे आणिक हासणे
एका हसण्यावरी शेवटी मातीसंगे सपाट ग

## ५०. मी केली त्याची चोरी

मी केली त्याची चोरी
कृष्णसखा तो दहीदूध चोरून रोज ठकवितो पोरी
नाही लाविला हात कशाला
केवळ डोळा वरती केला

मान वळवुनी हसले हळु मी राधागौळण गौरी
झट बदनावर ओढून घुंगट
वेलीमागे दडले झटपट

बावरली ग सयी मुलखाची खट्याळ ती स्वारी
मी नजरेने त्यास मारिले
काळीज त्याचे दुरून चोरिले

बघता बघता नकळत झाली किमया ही सारी...



प्रकाशक : क्षीरसागर आणि कंपनी, ६५४ शुक्रवार पेठ, पुणे ४११ ००२.
मुद्रक : रा. गो. पाटील, ज्ञानेश्वरी प्रेस, १४५७ शुक्रवार पेठ, पुणे २.

महान पौराणिक ग्रंथ

# श्री देवी भागवत

सर्व बारा स्कंदांचे सुरस मराठी भाषांतर

पृष्ठसंख्या ८५२ डबल क्राऊन

साडेतीन देवीपीठे व इतर अनेक देवींची रंगीत चित्रे

संपादक

कै.श्री. नारायण गंगाधरशास्त्री ओक

प्राचीन पुराण ग्रंथांपैकी **श्री देवी भागवत** हा अत्यंत महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. देवी भगवतीचे नाना लीलावतार यात वर्णन केले आहेत. ब्रह्मा - विष्णु - महेश यांचेपासून ते देव - दानव - मानव यांनी भगवतीची उपासना करून आपले जीवन पूर्ण निर्भय, कृतार्थ व भाग्यश्रीसंपन्न कसे केले यांच्या मनोरंजक कथा या ग्रंथात दिल्या आहेत. देवीगीता, गायत्रीसहस्त्रनाम, स्तोत्र कवच, देवी-पूजनाचा साग्रंत विधी. रुद्राक्ष महिमा इत्यादि देवी उपासकांना महत्वाचे विषय यात कथन केले आहेत.

– प्रकाशक –

**क्षीरसागर आणि कंपनी**

प्रकाशक व पुस्तक विक्रेते

६५४,शुक्रवार पेठ, पुणे ४११ ००२.